**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २०१२ च्या अंमलबजावणीबाबत वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक नेमणुकीच्या पथदर्शी प्रकल्पास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :राज्यपा २०१५/प्र.क्र. ३६/ का-१६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : ३१ मार्च ,२०१५

<u>वाचा</u> :- १.शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : आरएजे -१०२२/मुंमस/प्र.क्र. १७/२०११/ २०अ/, दिनांक ३१.१.२०१२
२. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : व्हीआयपी २०१२/प्र.क्र. ३७/का-१६, दिनांक ५ मार्च,२०१३
३. आयुक्त, आदिवासी विकास यांचे पत्र क्र. वहका २०१५/प्र.क्र.१७७/का-३ (७) १४९१, दिनांक १२ मार्च,२०१५.

<u>प्रस्तावना :</u>

मा. राज्यपाल यांच्या कार्यालयात केंद्र शासनाच्या आदिवासी विकास मंत्रालयाने दिलेल्या सुचनेस अनुसरुन आदिवासी कक्षाची स्थापना, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३१.१.२०१२ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. सदर आदिवासी कक्षामार्फत करावयाची कार्यवाही तसेच या कक्षामार्फत राबविण्यात येणा-या पथदर्शी प्रकल्पाबाबत मार्गदर्शक तत्वे आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ५.३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. त्यास अनुसरुन पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीने दिनांक १७.३.२०१५ रोजी झालेल्या ५ व्या बैठकीमध्ये आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सादर केलेल्या अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी ( वनहक्काची मान्यता ) अधिनियम २००६ व नियम २०१२ च्या अंमल बजावणीबाबत वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक नेमणुकीच्या प्रस्तावास तत्व:त मंजूरी दिलेली आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय :-**</u>

पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीने दिनांक १७.३.२०१५ रोजी झालेल्या ५व्या बैठकीमध्ये आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सादर केलेल्या प्रयोगिक तत्वावर यवतमाळ, पालघर, चंद्रपूर , नाशिक, आणि रायगड या ५ जिल्हा आणि २० तालुक्यासाठी अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी ( वनहक्काची मान्यता ) अधिनियम २००६ व नियम २०१२ च्या अंमल बजावणीबाबत वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक म्हणून मानधन तत्वावर कंत्राटी पध्दतीने नेमणूक करण्यास रु.२९,१०,०००/- (अक्षरी रु. एकोनत्तीस लक्ष दहा हजार ) एवढया रक्कमेस खालील प्रमाणे योजनेचे स्वरुप व निकष यांच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**<u>योजनेचे स्वरुप :-</u>**

वन हक्काची अंमलबजावणी २८ जिल्हयात सुरु असून आदिवासी लोकांमध्ये त्यांच्या हक्कांची जाणीव झालेली नाही. दावे दाखल करण्याच्या प्रक्रियेबाबत व कार्यपध्दती विषयी जनजागृती झालेली नाही. तसेच ग्राम सभा वनहक्क समिती कर्तव्य व जबाबदारीचे ज्ञान अवगत झालेले नाही. याशिवाय ग्रामसभा वनहक्क समिती स्तरावर व तालुकास्तरावर वन हक्क कायदा अंमलबजावणी कामा करीता मनुष्यबळ उपलब्ध नाही . सदर बाबी विचारात घेउुन अधिनियमाची अंमलबजावणी प्रभावीपणे करण्याकरीता प्रायोगिक तत्वावर यवतमाळ, पालघर , चंद्रपूर, नाशिक आणि रायगड जिल्यासाठी अंमलबजावणी प्रकल्प सुरु करण्यात येत आहे.

वनहक्क कायदा अंमलबजावणी करण्यासाठी खालील मानधन तत्वावरील कंत्राटी पध्दतीने मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे.

१) यवतमाळ , पालघर, चंद्रपूर , नाशिक आणि रायगड जिल्हयातील जिल्हास्तरीय समिती व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद या दोन्ही कार्यालयासाठी ५ वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक जिल्हास्तरावर नियुक्त करण्यात यावे.

२) २० तालुक्यातील जास्त जंगलाचा भाग असणा-या या पाच जिल्हयातील तालुक्यात तालुका कार्यालयाकरीता २० वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापकाची तालुकास्तरावर नियुक्ती करावी यासाठी जिल्हाधिकारी यांचेशी विचारविनिमय करुन पाच जिल्हयातील तालुके निश्चित करण्यात यावेत.

<u>व्यवस्थापक यांची कर्तव्ये व जबाबदारी</u>

वन हक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक यांचे कडून वनहक्क अंमलबजावणी कामे व कार्यवाही खालीलप्रमाणे करण्यात येईल.

१) अधिनियम २००६ नियम ४ (१) (ई) नुसार वन्यजीवन , वन व जैविक विविधता यांचे सरंक्षण करण्यासाठी ग्रामसभेच्या सदस्यांमधून समिती गठित करण्याची तरतूद आहे. त्यानुसार समित्या गठित करण्याबाबत उचित कार्यवाही करण्यात यावी.

२) वनहक्क व्यवस्थापक हे ग्राम पातळीवरील क्षेत्रात जाऊन गांवे / पाडे/ टोले व वस्ती स्थाने यांना भेटी देऊन तेथील लोकांना अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी ( वनहक्काची मान्यता ) अधिनियम २००६ नियम २००८ व सुधारणा नियम २०१२ अंमलबजावणी बाबतची माहिती उपलब्ध करुन देतील.

३) वैयक्तिक व सामुहिक वनहक्कासाठी वनहक्क दावेदारांना अर्ज तयार करुन देणे, वनहक्क दाव्यांसाठी लागणारी कागदपत्रे व पुरावे गोळा करण्यास मदत करणे, ग्रामसभेचा ठराव , पडताळणी नोटीस, प्रमाणपत्रे प्राप्त करण्यास व वनहक्क समितीला वैयक्तिक व सामुहिक वनहक्कासाठी दाव्याचा अर्ज कसा करावा याची माहिती वन हक्क दावेदारांना देणे, तसेच ग्रामसभा व वनहक्क समिती यांना मदत करतील.

४) अधिनियमातील तरतूदीनुसार जिल्हास्तरीय समितीने / उपविभागीय स्तरीय समितीने दावे निकाली काढलेले नाहीत. अशा प्रकरणात जिल्हास्तरीय समितीने अंतिम निर्णय दिलेला आहे. परंतु सदर अंतिम निर्णय देण्यापुर्वी उपविभागीय समितीने अथवा जिल्हासमितीने यथस्थिती दावेदारांच्या / ग्राम सभेच्या शिफारशीमध्ये फेरबदल केले असतील अथवा दावा फेटाळला असेल व याबाबत संबधीत दावेदारास लेखी ज्ञापनाद्वारे ( Speaking order ) कळविले नसेल तर अधिनियमातील तरतूदीनुसार सदर दावा निकाली काढला आहे असे म्हणता येणार नाही. म्हणून ज्या प्रकरणात अधिनियमातील तरतूदीनुसार विहीत प्रक्रिया पार पाडली गेली नसेल व दावेदाराने उपविभागीय स्तरीय समिती अथवा जिल्हास्तरीय समितीकडे अपील सादर केले असेल तर सदर अपील संबंधीत प्राधिकारणाने दाखल करुन घेतले आहे किंवा नाही तसेच नियमानुसार कामे झाल्याची खात्री करण्याची जबाबदारी आणि जिल्हास्तरीय समिती व उपविभागीय स्तरीय समिती यांचेशी समन्वय साधण्याची जबाबदारी व्यवस्थापनाची राहील.

५) जिल्हाधिकारी यांनी मान्य केलेल्या दाव्यांची वन जमिन मोजणी करणे तसेच ७/१२ वाटप करणे या शिवाय ज्या वन जमिनींना कंपार्टमेंट नंबर आहेत किंवा ज्या वन जमिनी बिन नंबरी आहेत तसेच महसूली अभिलेखामध्ये त्या जमिनीची ७/१२ उतारा उघडलेला नाही अशा प्रकरणात वन विभागांतर्गत कंपार्टमेंट फॉर्म न.१अ ( पटटेदार पत्रक ) तयार करुन अनसर्व्हेड कंपार्टमेंट मधील लाभ धारकांना अधिकार अभिलेख उपलब्ध करुन देणे व महसुल व वन प्राधिकारी यांचेशी समन्वय साधण्याची जबाबदारी व्यवस्थापनाची राहील.

६) वनहक्क अधिनियमांतर्गत सुधारित नियम २०१२ व पंचायत क्षेत्र विस्तार अधिनियम १९९६ ( पेसा ) यातील मार्गदर्शक तत्वानुसार व्हिलेज कॉम्युनिटीज यांना मार्गदर्शन करणे. तसेच जंगलातील गौण वन उपजेचे व्यवस्थापन आणि अनुसूचित क्षेत्रातील बाजाराचे व्यवस्थापन यात मदत करणे

शैक्षणिक पात्रता-

१) शासनमान्य विद्यापिठाचा कोणत्याही शाखेचा पदविधर

२) व्यवस्थापन पदव्युत्तर पदवी MBA/MPM/MSW यांना प्राधान्य राहील.

३) संगणकाचे ज्ञान आवश्यक . MSCIT ( शासनमान्य प्रमाणपत्र )

निवड पध्दती-

पालघर, नाशिक, रायगड व चंद्रपूर जिल्हयातील जास्त खप असणा-या दैनिक वृत्तपत्रात प्रसिध्दी देऊन पात्र व योग्य उमेदवाराची मुलाखती द्वारे ( walk- in-interview ) वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक म्हणून निवड करण्यात येईल.

भरती निवड समिती-

( जिल्हा व तालुका स्तरावरील संबधीत खालील अधिकारी )

जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा स्तरीय वनहक्क समिती- समिती प्रमुख

मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद- सदस्य

अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग- सदस्य

उपवन संरक्षक ( प्रादेशिक ) वनविभाग- सदस्य

उपविभागीय अधिकारी तथा अध्यक्ष, उपविभागीय स्तरीय वनहक्क समिती- सदस्य

जिल्हाधिकारी हे वन हक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक यांची नियुक्ती ६ महिन्यासाठी करतील.

**योजनेच निकष :-**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नाशिक यांचे सदर प्रकल्पावर नियंत्रण राहील. सदर योजनेवरील खर्च मा. राज्यपाल कार्यालयातील आदिवासी कक्षा अंतर्गत उपलब्ध निधीतून करण्यात येईल. त्यानुसार जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हास्तरीय वन हक्क समिती यांना प्रकल्पासाठी लागणा-या निधीचा पुरवठा होईल.

वनहक्क अंमलबजावणी व्यवस्थापक ( जिल्हास्तर ) हे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे व वनहक्क अंमलबजावणी व्यवस्थापक ( तालुकास्तर ) हे गट विकास अधिकारी ,पंचायत समिती यांचे नियंत्रणेत काम करतील.

वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक ( जिल्हास्तर व तालुकास्तर ) हे जिल्हाधिकारी आणि मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांचेकडे अहवाल सादर करतील.

प्रकल्पाचे काम ६ महिन्यात पुर्ण करावयाचे असून अंतिम प्रगती अहवाल मा. राज्यपाल कार्यालयातील आदिवासी कक्ष यांचेकडे सादर करण्यात येईल.

**योजनेचा अपेक्षित खर्च :-**

१. जिल्हास्तरावरील वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक यांना दरमहा एकत्रित मानधन रु.२०००० + प्रोत्साहन भत्ता रु.६२.५०/- जिल्हास्तरीय वनहक्क समितीने मान्य केलेल्या सामुहिक वन हक्क दाव्याच्या आधारावर ( Section ३(१) (b) ते ३(१) (m) ) प्रत्येक प्रकरणासाठी रु.६२.५०/-

२. तालुकास्तरावरील वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक यांना दरमहा एकत्रित मानधन रु.१५००० + प्रोत्साहन भत्ता रु.१५०/- जिल्हास्तरीय वनहक्क समितीने मान्य केलेल्या सामुहिक वन हक्क दाव्याच्या आधारावर ( Section ३(१) (b) ते ३(१) (m) ) प्रत्येक प्रकरणासाठी रु.१५०/-

**एकूण आर्थिक भार-** (प्रकल्पाचा एकुण खर्च )

१) **जिल्हा व्यवस्थापक-** ( एका महिन्याला २० प्रकरणे याप्रमाणे २० तालुक्यातील ४०० प्रकरणे या प्रमाणे ६ महिन्यात २४०० प्रकरणे )

मानधन - २०००० x ५ x ६ ( महिने ) = रु. ६,००,०००/-

प्रोत्साहन भत्ता ६२.५० x २४०० = १,५०,०००/-

२) **तालुका व्यवस्थापक- (** एका महिन्याला २० प्रकरणे याप्रमाणे २० तालुक्यातील ४०० प्रकरणे या प्रमाणे ६ महिन्यात २४०० प्रकरणे )

मानधन १५००० x २० x ६ ( महिने ) = रु. १८,००,०००/-

प्रोत्साहन भत्ता १५०x २४०० = ३,६०,०००/-

**एकूण रु. २९,१०,०००/- (अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष दहा हजार )एवढया खर्चास मान्यता देण्यात येत आहे.**

सदर प्रकल्पाचे सनियंत्रण आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडून करण्यात येणार असून सदर प्रकल्पाची अंमलबजावणी वनहक्क अंमलबजावणी व्यवस्थापक यांचेकडून जिल्हास्तरावरुन मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे नियंत्रणेत आणि वनहक्क अंमलबजावणी व्यवस्थापक यांचेकडून तालुका स्तरावरुन गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांचे नियंत्रणेत करण्यात येणार आहे. याकरीता आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे नियंत्रण अधिकारी म्हणून राहतील व सहाय्यक प्रकल्प अधिकारी, आयुक्त आदिवासी विकास कार्यालय , नाशिक हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राहतील.

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी ( वनहक्काची मान्यता ) अधिनियम २००६ व नियम २०१२ च्या अंमल बजावणीबाबत वनहक्क कायदा अंमलबजावणी व्यवस्थापक म्हणून मानधन तत्वावर

कंत्राटी पध्दतीने नेमणुकीच्या योजनेसाठी होणारा खर्च मागणी क्र.टि-५, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मगासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -०२, अनुसूचित जमातीचे कल्याण -७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) (५३)आदिवासी कक्षामार्फत राज्यातील अनुसूचित क्षेत्रामध्ये पथदर्शी प्रकल्पाची अंमलबजावणी ( २२२५-डी ३६९ )-३१ सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षाकरीता केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन वित्त विभागाचा अनौपचारीक क्रमांक १५८/ व्यय-१४, दिनांक ३१.३.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०३३१२११७२०६९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Chandrashekhar J Deshpande

Digitally signed by Chandrashekhar J Deshpande
DN: CN = Chandrashekhar J Deshpande, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.31 23:30:49 +05'30'

**( चं.ज.देशपांडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल लेखापरिक्षा , ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र -१, मुंबई
४. महालेखापाल लेखापरिक्षा , ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर,
५. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, (वने ) मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान मुख्य वन संरक्षक, ( वनबल प्रमुख ) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१०. जिल्हाधिकारी, यवतमाळ, पालघर, चंद्रपूर, नाशिक आणि रायगड
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ, पालघर, चंद्रपूर, नाशिक आणि रायगड
१२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक , अमरावती, नागपूर
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ, पालघर, चंद्रपूर, नाशिक आणि रायगड
१४. सर्व उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कक्ष अधिकारी, (का-६ ) अर्थसंकल्प शाखा, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती कार्यासन-१६